**श्री.राजेंद्र हरी चव्हाण, कार्यकारी अभियंता (यांत्रिकी) यांची मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (MMRDA) येथे प्रतिनियुक्तीने नियुक्ती.**

# महाराष्ट्र शासन
## जलसंपदा विभाग
### शासन आदेश क्रमांकः संकीर्ण-२०१७/(५९/२०१७)/आ.(वर्ग-१)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.

**तारीखः २३ ऑगस्ट, २०१७.**

**संदर्भ :-** वित्त विभागाची दि.०९.०५.२०१३ ची अधिसूचना.

**शासन आदेश:-**

श्री.राजेंद्र हरी चव्हाण, कार्यकारी अभियंता (यांत्रिकी), यांत्रिकी भंडार व विकास विभाग, कळवा ठाणे यांची सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (MMRDA) येथे प्रतिनियुक्तीने नियुक्तीस सक्षम प्राधिकरणाने मंजूरी दिलेली आहे.

२. श्री.चव्हाण यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी हा प्रतिनियुक्तीचे आदेश निर्गमित झाल्यापासून तीन वर्षापर्यन्त राहील. प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा इत्यादी) नियम १९८१ मधील परिशिष्ट दोन मधील नमूद शासकीय कर्मचाऱ्यांची स्वीयेतर सेवेत बदली करण्यासंदर्भातील प्रमाण अटी व शर्ती मधील तरतुदीनुसार व या संदर्भातील वित्त विभागाच्या दि.०९.०५.२०१३ मधील सुधारित अधिसूचनेतील तरतूदीनुसार या आदेशाच्या सोबत जोडलेल्या **"परिशिष्ट - अ"** प्रमाणे राहतील.

३. हे आदेश, शासन निर्णय, वित्त विभाग क्र.स्वीएसे १०८७/८५३/सेवा-८, दि.१८.७.१९८५ अन्वये मंत्रालयीन विभागाना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१७०८२३१२०४३६९३२७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prashant Jagdish Sajanikar

Digitally signed by Prashant Jagdish Sajanikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a8cd67058795ac5a961c2b41207cb6d24b79e17716af754c9fc40fd4145416f1, serialNumber=217003e42c820ec29c89162937f98929453cc6295b34f71ea285041053a66aa7, cn=Prashant Jagdish Sajanikar
Date: 2017.08.23 13:17:43 +05'30'

**(प्रशांत साजणीकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र :- वरीलप्रमाणे (परिशिष्ट-अ)**

प्रत,

१. प्रधान सचिव (जलसंपदा प्रकल्प व विकास) / सचिव (जलसंपदा व्यवस्थापन व लाक्षेवि), / सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सर्व कार्यकारी संचालक / महासंचालक, जलसंपदा विभाग.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, औरंगाबाद.

४. सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
५. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
६. मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक.
७. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
८. सर्व अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग.
९. उप महानगर आयुक्त (प्रशासन), मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (MMRDA).
१०. खाजगी सचिव, मा. मंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई.
११. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, जलसंपदा,मंत्रालय, मुंबई.
१२. श्री.राजेंद्र हरी चव्हाण, कार्यकारी अभियंता (यांत्रिकी), यांत्रिकी भंडार व विकास विभाग, कळवा ठाणे.
१३. संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१४. सर्व कार्यासने जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
१५. कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.

## परिशिष्ट "अ"

जलसंपदा विभाग शासन आदेश क्र.संकीर्ण-२०१७/(५९/२०१७)/आ(वर्ग-१), दिनांक : ०८.२०१७.
सोबतचे सहपत्र.

श्री.राजेंद्र हरी चव्हाण, कार्यकारी अभियंता (यांत्रिकी), यांत्रिकी भंडार व विकास विभाग, कळवा ठाणे यांच्या कार्यकारी अभियंता (यांत्रिकी), मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (MMRDA) या पदाच्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती :

१. प्रतिनियुक्तीचा कालावधी:- श्री.राजेंद्र हरी चव्हाण यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी **दि.२३.०८.२०१७ पासून पुढील ३ वर्षापर्यंत** असा आहे, परंतु

(एक) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हितास्तव शासनाला आवश्यक वाटली तर त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन राखून ठेवील.

(दोन) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्याला मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेतर नियोक्त्याला राहील. मात्र त्याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला ३ महिन्यांची नोटीस दिली पाहिजे.

(तीन) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी ३ महिन्यांची लेखी नोटीस शासनाला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत घेण्याची मुभा राहील.

२. वेतन:- श्री.राजेंद्र हरी चव्हाण यांना स्वीयेत्तर सेवेत असतांना कार्यकारी अभियंता (यांत्रिकी) पदाकरिता विहित केलेल्या रुपये १५६००-३९१०० (ग्रेड पे रु.६६००/-) या वेतनमानात वेतन अनुज्ञेय राहील.

३. महागाई भत्ता:- श्री.राजेंद्र हरी चव्हाण राज्य शासनाकडे आपले वेतनमान कायम ठेवतील किंवा स्वीयेत्तर सेवेतील पदांशी संलग्न असणा-या वेतनमानात वेतन घेतील, त्याप्रमाणे त्यांना राज्य शासनाकडे किंवा स्वीयेत्तर नियोक्त्याकडे नियमानुसार अनुज्ञेय असलेला महागाई भत्ता मिळण्याचा हक्क असेल.

४. घरभाडे भत्ता / स्थानिक पूरक भत्ता:- श्री.राजेंद्र हरी चव्हाण यांना राज्य शासनाच्या नियमानुसार वेळोवेळी अनुज्ञेय असेल त्याप्रमाणे घरभाडे भत्ता, स्थानिक पूरक भत्ता घेण्याचा हक्क असेल पण स्वीयेत्तर नियोक्ता स्वेच्छा निर्णयानुसार स्वीयेत्तर सेवेच्या नियमान्वये हे भत्ते मंजूर करु शकेल.

५.	पदग्रहण अवधी वेतन व बदली प्रवास भत्ता:- स्वीयेतर सेवेत बदली झाल्यानंतर आणि तेथून परत आल्यानंतर अशा दोन्ही वेळचा पदग्रहण अवधीमध्ये त्यांचे वेतन व प्रवासभत्ता राज्य शासनाच्या संबंधित नियमानुसार स्वीयेत्तर नियोक्त्यांकडून देण्यात येतील.

६.	प्रतिनियुक्तीच्या कालावधीत कर्तव्यार्थ केलेल्या प्रवासाकरिता प्रवासभत्ता:- श्री.राजेंद्र हरी चव्हाण स्वीयेत्तर सेवेत रुजू झाल्यानंतर कराव्या लागणा-या प्रवासाकरिता राज्य शासनाच्या संबंधित नियमान्वये किंवा स्वीयेत्तर नियोक्ता नियमान्वये प्रवासभत्ता आणि दैनिक भत्ता मिळण्याचा हक्क असेल.

७.	रजा:- अशा बदलीपूर्वी श्री.राजेंद्र हरी चव्हाण यांना लागू असलेले रजेचे नियम बदलीनंतरही त्यांना लागू राहतील. महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ च्या नियम १८ (२) मध्ये दिलेल्या कार्यपध्दतीचा काटेकोरपणे अवलंब करण्यात यावा. स्वीयेत्तर सेवेतून मुक्त झाल्यानंतर त्यांना परस्पर रजेवर जाण्यास स्वीयेत्तर नियोक्त्याने परवानगी देता कामा नये. म्हणजेच प्रथम त्यांना शासकीय सेवेत रुजू होऊन मूळ विभागातील सक्षम प्राधिका-यांकडून नेहमीच्या पध्दतीने त्यांनी आपली रजा मंजूर करुन घेतली पाहिजे.

८.	स्वीयेत्तर सेवेच्या दरम्यान किंवा अखेरीस घेतलेल्या रजेच्या कालावधी बद्दल द्यावयाच्या कोणत्याही पूरक भत्त्यांचा संबंधातील संपूर्ण खर्च स्वीयेत्तर नियोक्त्याला सोसावा लागेल.

९.	विकलांगता रजेबद्दल रजा वेतन:- स्वीयेतर सेवेत किंवा अशा सेवेमुळे आलेल्या विकलांगतेबद्दल मंजूर करता येईल अशा रजेच्या संबंधीत, अशी विकलांगता स्वीयेत्तर सेवा संपल्यानंतर उघडकीस आली तरीसुद्धा रजा वेतन देण्यास स्वीयेतर नियोक्ता जबाबदार असेल. अशा रजा वेतनाचा खर्च स्वीयेतर नियोक्त्याकडून वसूल करण्यात येईल.

१०.	रजा वेतन व निवृत्तीवेतन अंशदाने:-

(अ) महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा इत्यादी) नियम १९८१ मधील परिशिष्ट-४ मध्ये विहित केलेल्या दरानुसार स्वीयेतर नियोक्त्याकडून रजा वेतन आणि निवृत्तीवेतन अंशदाने देण्यात येतील.

(ब) स्वीयेतर नियोक्ता, प्रत्येक वित्तीय वर्षाच्या अखेरीपासून १५ दिवसांच्या आत किंवा वित्तीय वर्ष संपण्यापूर्वी स्वीयेतर सेवेतील प्रतिनियुक्ती, समाप्त होत असेल तर स्वीयेतर सेवेच्या अखेरीस, पुढील दराने वार्षिक रजा वेतन व निवृत्तीवेतन अंशदाने देईल.

(एक) रजा वेतन अंशदाने दरमहा नियमाप्रमाणे

(दोन) निवृत्ती वेतन अंशदाने दरमहा नियमाप्रमाणे

रजा वेतन अंशदान आणि निवृत्तीवेतन अंशदान पुढील लेखाशीर्षाखाली जमा करावे.

(एक) रजा वेतन अंशदाने:- "०६५, इतर प्रशासकीय सेवा-सी-इतर सेवा (टी) इतर जमा रक्कमा रजा वेतन अंशदान."

(दोन) निवृत्तीवेतन अंशदान:- "०६६, निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ यांच्या संबंधातील अंशदाने व वसुलीच्या रकमा-ए-वर्गण्या व अंशदाने (एक) स्वीयेतर सेवेतील अधिकारी."

उपरोक्त दर लेखापरीक्षा कार्यालयाकडून कायम केले जाईपर्यंत तात्पुरते मानले जातील आणि ते भूतलक्षी प्रभावाने समायोजित करता येतील.

(क) स्वीयेत्तर सेवेतील शासकीय कर्मचा-यांच्या बाबतीत, रजा वेतनाची किंवा निवृत्ती वेतनाची देय असणारी अंशदाने पूर्वोक्त कालावधीत दिली गेली नाहीत तर शासनाने स्पष्टपणे सूट दिली नसल्यास, स्वीयेत्तर नियोक्त्या, हा अदत्त अंशदानाच्या रकमेवर, म्हणजेच पूर्वोक्त कालावधी संपण्याच्या तारखेपासून अंशदाने अंतिमरित्या दिल्याच्या तारखेपर्यन्त देय होणा-या रकमेवर दर दिवशी प्रत्येकी १०० रुपयात दोन पैसे या दराने शासनाला व्याज देईल. शासकीय कर्मचारी किंवा स्वीयेत्तर नियोक्ता यापैकी ज्यांनी अंशदान भरले असेल तो व्याज देईल.

(ड) रजा वेतन अंशदाने आणि निवृत्ती वेतन अंशदाने निरनिराळया लेखाशिर्षाखाली जमा केले जात असल्यामुळे ती वेगवेगळी भरावीत आणि कोणत्याही बाबी दाखल शासनाकडून वसूल करावयाच्या येणे रकमेची अशा अंशदानामधून वजावट करण्यात येऊ नये.

११. रजामुदती प्रवास सवलत:- या विषयावरील राज्य शासनांच्या संबंधित नियमान्वये शासकीय कर्मचा-याला रजा मुदती प्रवास सवलत मिळण्याचा हक्क असेल, या संबंधातील खर्च नियोक्त्याला सोसावा लागेल.

१२. रजेचे रोखीकरण करणे:- महाराष्ट्र नागरीसेवा (रजा) नियम १९८१ च्या नियम ७३ अन्वये अनुज्ञेय असलेल्या अर्जित रजेच्या रोखीकरणाचा लाभ घेण्याचा हक्क शासकीय कर्मचा-याला असेल. रजा वेतनावर प्रदेय असणा-या पूरक भत्त्याचा व महागाई भत्त्याचा खर्च स्वीयेत्तर नियोक्त्याला सोसावा लागेल.

१३. वैद्यकीय सवलती:- शासकीय कर्मचा-यास महाराष्ट्र नागरी सेवा (वैद्यकीय उपचार) नियम १९६१ अनुसार अनुज्ञेय असणा-या वैद्यकीय सुविधांपेक्षा कमी प्रतीच्या नसतील अशा सुविधा मिळण्याचा हक्क असेल आणि त्यावरील खर्च स्वीयेत्तर नियोक्त्याला सोसावा लागेल.

१४. सर्वसाधारण भविष्यनिर्वाह निधीची वर्गणी:- शासकीय कर्मचारी विहित नियमानुसार भविष्य निर्वाह निधीचा वर्गणीदार असेल त्याच निधीला वर्गणी देणे पुढे चालू ठेवील.

१५. विभागीय चौकशी:- जर शासकीय कर्मचा-याविरुध्द विभागीय चौकशी सुरु करावयाची असेल तर त्याला त्याच्या मूळ विभागाकडे पाठविण्यात येईल. शासन त्याला निर्वाह भत्ता देईल, पण तो स्वीयेत्तर नियोक्त्याकडून वसूल करण्यात येईल.

१६. गट विमा योजना लागू करणे:- स्वीयेत्तर नियोक्त्याने श्री.राजेंद्र हरी चव्हाण, कार्यकारी अभियंता यांचेकडून राज्य शासकीय गट विमा योजना अंतर्गत आवश्यक अशी वसुली दरमहा करावी व ती खाली दिलेल्या लेखाशीर्षाखाली भरावी.

"८११ विमा आणि निवृत्ती वेतन निधी,

इतर विमा आणि निवृत्तीवेतन निधी,

राज्य शासकीय गट विमा योजना "

----------X----------